आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शिर्षांतर्गत निधी वितरण (लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८ व २२०२ एच ९७३-वेतन)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२५/प्र.क्र.०४/का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७ एप्रिल,२०२५ .

**वाचा :-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२५/ प्र.क्र.४४/अर्थसंकल्प.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शालेय शिक्षण विभागाच्या अधिनस्त माध्यमिक शाळा, अशासकीय कनिष्ठ महाविद्यालये व सैनिकी शाळांमधील आदिवासी तुकड्यांवरील कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्याकरीता सन २०२५-२६ च्या अर्थसंकल्पीत तरतुदीतून वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेला निधी वितरीत करण्याबाबत शालेय शिक्षण विभागाने संदर्भाधीन क्र.१ अन्वये विनंती केली आहे. शालेय शिक्षण विभागाच्या उपरोक्त प्रस्तावास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२४-२५ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२०२-सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत वित्त विभागाने वितरणाकरीता उपलब्ध करून दिल्याप्रमाणे वेतनासाठी वार्षिक अर्थसंकल्पीत तरतुदीतून खालीलप्रमाणे निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२५-२६ मधील अर्थसंकल्पित तरतूद | वित्त विभागाकडून अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध निधी | वितरणाकरीता प्रस्तावित निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| माध्यमिक शाळांना सहायक अनुदान | २२०२ १९०१ | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | ११०५७.५९ | ९९५.१८३१ | ९९५.१८३१ |
| कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान | २२०२ १९४८ | | ६९६.७२ | ६२.७०४८ | ६२.७०४८ |
| सैनिकी शाळांमधील आदिवासींच्या तुकडीला सहाय्य | एच २२०२ ९७३ | | ३५७५.४४ | ३२१.७८९६ | ३२१.७८९६ |
| **एकूण** | | | **१५३२९.७५००** | **१३७९.६७७५** | **१३७९.६७७५** |

२. उपरोक्तप्रमाणे **एकूण रु. १३७९.६७७५० लाख (अक्षरी रुपये तेरा कोटी एकोनऐंशी लाख सदुसष्ठ हजार सातशे पन्नास फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियमांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत व प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०७१५५३१६१४२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2025.04.07 16:42:29 +05'30'

**(किरण कि. पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

४. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. उप सचिव/अवर सचिव/क.अ.(कार्या-११), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.